**केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री जनविकास कार्यक्रमातंर्गत (PMJVK) हिंगोली जिल्ह्यातील हिंगोली शहर येथील सद्भाव मंडप बांधकामासाठी तिसऱ्या टप्प्यातील अनुदान वितरीत करण्याबाबत. (केंद्र हिस्सा+राज्य हिस्सा) सन २०२१-२२.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अविवि-२०१८/प्र.क्र.९३/का.७,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: - १७ जानेवारी, २०२२

**संदर्भ: -**

१. अवर सचिव, अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.MsDP-१३/१२२/२०१८-MsDP-MOMA, दि १०/१२/२०१८.
२. अवर सचिव, अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.MsDP-१३/१५/२०१९-MsDP-MOMA, दि.१६/०१/२०१९.
३. शासन ज्ञापन,अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.अ.वि.वि.-२०१८/प्र.क्र.९३/का-७,दि.१३/०२/२०१९.
४. शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.अ.वि.वि.-२०१८/प्र.क्र.९३/का-७, दि.१३/०२/२०१९.
५. अवर सचिव, अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.१३/१५/२०१९-MsDP-MOMA, दि.०१/१२/२०२०.
६. शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.अ.वि.वि.-२०१८/प्र.क्र.९३/का-७,दि.२१/१२/२०.
७. अवर सचिव, अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.१३/१५/२०१९-MsDP-MOMA, दि.२०/१२/२०२१.

**प्रस्तावना :-**

प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमातंर्गत (PMJVK) केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाच्या गठित शक्तिप्रदान समितीने दि.०३/१२/२०१८ रोजी झालेल्या १० व्या बैठकीत हिंगोली जिल्ह्यातील हिंगोली शहर येथे अल्पसंख्याकांसाठी सद्भाव मंडप बांधकामासाठी एकूण रु.१,४६,०००,००/- (अक्षरी रू. एकशे सेहेचाळीस लाख फक्त) इतक्या रकमेच्या प्रस्तावास मान्यता दिली असल्याचे संदर्भ क्र.(२) अन्वये कळविण्यात आले आहे. केंद्र शासनाने संदर्भ क्र. (२) व (५) येथील आदेशाद्वारे PMJVK अंतर्गत मान्यताप्राप्त हिंगोली जिल्ह्यातील हिंगोली शहर येथे अल्पसंख्याकांसाठी सद्भाव मंडप बांधकामासाठी केंद्र हिश्श्यातील पहिल्या व दुसऱ्या टप्प्यातील एकूण रु.५२,८०,०००/- (अक्षरी रू.बावन्न लाख ऐंशी हजार फक्त) इतका निधी वितरित केला आहे. संदर्भ क्र.(४) व (६) अन्वये केंद्र शासनाकडून वितरित करण्यात आलेला केंद्र हिश्श्यातील रु.५२,८०,०००/- (अक्षरी रू.बावन्न लाख ऐंशी हजार फक्त) तसेच राज्य हिश्यातील रु.३४,८०,०००/- (अक्षरी रू.चौतीस लाख ऐंशी हजार फक्त) असा एकूण रु.८७,६०,०००/- (अक्षरी रू.सत्याऐंशी लाख साठ हजार फक्त) इतका निधी पहिल्या व दुसऱ्या टप्प्यात जिल्हाधिकारी, हिंगोली यांना विहित अटींच्या अधिन राहून वितरीत करण्यात आला आहे. सदर निधी वितरणाबाबत केंद्र व राज्य हिश्श्याचे प्रमाण ६० : ४० असे आहे.

२. प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमातंर्गत (PMJVK) हिंगोली जिल्ह्यातील हिंगोली शहर येथील सद्भाव मंडप बांधकामासाठी केंद्र शासनाकडून तिसऱ्या टप्प्यात वितरित करण्यात आलेला केंद्र हिश्श्यातील रु.३५,२०,०००/- (अक्षरी रू.पस्तीस लाख वीस हजार फक्त) तसेच राज्य हिश्यातील तिसऱ्या टप्प्याचा रु.२३,२०,०००/- (अक्षरी रू.तेवीस लाख वीस हजार फक्त) असा एकूण रु.५८,४०,०००/-(अक्षरी रू.अठ्ठावन्न

लाख चाळीस हजार फक्त) इतका निधी जिल्हाधिकारी, हिंगोली यांना मंजूर करुन वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

केंद्र शासनाकडून संदर्भ क्र. (७) येथील आदेशाव्दारे प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमातंर्गत (PMJVK) हिंगोली शहर जि.हिंगोली येथे अल्पसंख्याकांसाठी सद्भाव मंडप बांधकामासाठी वितरित करण्यात आलेली केंद्र हिश्श्यातील तिसऱ्या टप्प्यातील एकूण रु.३५,२०,०००/- (अक्षरी रू.पस्तीस लाख वीस हजार फक्त) तसेच राज्य हिश्यातील दुसऱ्या टप्प्यातील रु.२३,२०,०००/- (अक्षरी रू.तेवीस लाख वीस हजार फक्त) अशी एकूण रु.५८,४०,०००/-(अक्षरी रू.अठ्ठावन्न लाख चाळीस हजार फक्त) इतकी रक्कम जिल्हाधिकारी, हिंगोली यांना खालील प्रमाणे वितरित करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे :-

(रू.लाखात)

| अ. क्र. | कामांचे नाव | प्रशासकीय मान्यता | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण प्रकल्प किंमत | वितरीत पहिला व दुसरा हप्ता | | वितरीत करावयाचा तिसरा हप्ता | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | केंद्र | राज्य | केंद्र | राज्य |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० |
| १ | हिंगोली शहर जि. हिंगोली येथे सदभाव मंडप बांधकाम. | १४६.०० | ८८.०० | ५८.०० | १४६.०० | ५२.८० | ३४.८० | ३५.२० | २३.२० |
| | **एकूण** | **१४६.००** | **८८.००** | **५६.००** | **१४६.००** | **५२.८०** | **३४.८०** | **३५.२०** | **२३.२०** |

२. केंद्र शासनाकडून केंद्र पुरस्कृत योजनांच्या निधीचे परिणामकारक व्यवस्थापन करण्याच्या तसेच निधी विनियोगामध्ये अधिक परिणामकारकता आणण्याच्या दृष्टीने केंद्र शासनाच्या सार्वजनिक वित्तीय प्रणाली (PFMS) व्दारे निधी वितरीत करण्यास सुरूवात करण्यात आली आहे. त्यानुषंगाने प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रम ही केंद्र पुरस्कृत योजना असून PFMS प्रणालीच्या सुधारीत कार्यपध्दतीनुसार प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रम या योजनकरीता Single Nodal Agency म्हणून अवर सचिव,अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय यांची नियुक्ती करण्यात आली आहे. तसेच सदर योजनेचे SNA खाते स्टेट बँक ऑफ इंडिया, मंत्रालय शाखा येथे उघडण्यात आले आहे. सदर योजना PFMS प्रणालीवर Mapping करण्याची प्रक्रीया पूर्ण करण्यात आली असून केंद्र शासनाकडून सदर बांधकामास PFMS प्रणालीव्दारे निधी वितरीत केला आहे. जिल्हाधिकारी, हिंगोली यांनी स्टेट बँक ऑफ इंडिया, हिंगोली शाखा येथे योजनेचे खाते उघडले असून, उघडण्यात आलेले खाते योजनेच्या SNA खात्याशी PFMS प्रणालीवर MAP करण्यात आले आहे.

३. सन २०२१-२२ या वर्षात प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत हिंगोली जिल्ह्यातील हिंगोली शहर येथे अल्पसंख्याकांसाठी सद्भाव मंडप बांधकामासाठी केंद्र शासनाकडून वितरीत केलेला निधी योजनेच्या स्टेट बँक ऑफ इंडिया, मंत्रालय शाखा येथे उघडण्यात आलेल्या SNA खात्यावर घेण्यात यावा . सदर SNA आकाऊंट चा खाते क्र.40533345678 व IFSC CODE - SBIN0061524 असा आहे. तदनंतर अर्थसंकल्प शाखेने PFMS प्रणालीवरून जिल्हाधिकारी, हिंगोली यांना निधी वितरीत करण्यात येईल. सदर निधी SNA खात्यावर जमा करून घेण्याकरीता अवर सचिव (१), अल्पसंख्याक विकास विभाग यांना उपरोक्त तक्त्यातील स्तंभ क्र.(०९) व (१०) प्रमाणे मंजूर करण्यात आलेल्या केंद्र व राज्य हिश्श्यातील तिसऱ्या

टप्प्यातील रु.५८,४०,०००/- (अक्षरी रू.अठ्ठावन्न लाख चाळीस हजार फक्त) रकमेच्या मर्यादेत अर्थसंकल्प वितरण प्रणालीतून आहरित व संवितरित करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे. सदर बांधकामाकरीता निधी अवर सचिव (१), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सुपूर्द करण्यात येत असून याकरिता ते आहरण व संवितरण अधिकारी म्हणून व उपसचिव (अर्थसंकल्प), अल्पसंख्याक विकास विभाग हे नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. सदर रकमेचा ईसीएस (ECS) अवर सचिव (१), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुबई यांच्या नावाने काढण्यात यावा.

अवर सचिव (१), अल्पसंख्याक विकास विभाग यांनी प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत हिंगोली जिल्ह्यातील हिंगोली शहर येथे अल्पसंख्याकांसाठी सद्भाव मंडप बांधकामासाठी आहरित केलेली रक्कम स्टेट बँक ऑफ इंडिया, मंत्रालय, शाखा येथे उघडण्यात आलेल्या योजनेच्या SNA खात्यामध्ये जमा करावी. सदर SNA आकाऊंट चा खाते क्र.४०५३३३४५६७८ असा आहे. तदनंतर अर्थसंकल्प शाखेने सदर रक्कम PFMS प्रणालीव्दारे जिल्हाधिकारी, हिंगोली यांना वितरीत करण्यात यावी. जिल्हाधिकारी, हिंगोली यांनी सदर रक्कम विकासकामांच्या अंमलबजावणीशी संबंधित अंमलबजावणी यंत्रणेस रितसर वितरित करावी.

४. प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमातंर्गत (PMJVK) सद्भाव मंडप बांधकामाच्या अंमलबजावणीकरीता जिल्हाधिकारी,हिंगोली हे मुख्य नियंत्रक अधिकारी व अंमलबजावणी अधिकारी राहतील.

५. प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमातंर्गत (PMJVK) मान्यताप्राप्त हिंगोली शहर येथील अल्पसंख्याकांसाठी सद्भाव मंडप बांधकाम हे केंद्र शासनाच्या टाईप-१ च्या टाईपप्लॅननुसार तसेच, यासाठीच्या सविस्तर अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सक्षम प्राधिकाऱ्याने दिलेल्या तांत्रिक मंजूरीनुसार सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत करण्यात यावे. प्रस्तुत सद्भाव मंडप बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकिय मान्यता देण्याबाबतचे आदेश या विभागाव्दारे दिनांक १३/०२/२०१९ च्या शासन ज्ञापनान्वये निर्गमित करण्यात आले आहेत.

६. प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमातंर्गत (PMJVK) मान्यताप्राप्त सद्भाव मंडप बांधकामाच्या अंमलबजावणीसाठी केंद्र + राज्य हिश्यांतर्गत वितरीत करण्यात आलेला निधी सुरक्षिततेच्या दृष्टीकोनातून केवळ राष्ट्रीयीकृत बॅकेत ठेवण्यात यावा. सदर प्रयोजनासाठी राष्ट्रीयीकृत बॅकेत स्वतंत्र बॅक खाते उघडण्यात यावे.

७. सदरचा खर्च करण्यास वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत C.V.C च्या मार्गदर्शक तत्वानुसार / CAG च्या निर्देशानुसार कोणताही शासन निर्णय / अटी व शर्तीचा भंग होणार नाही, याची दक्षता संबंधित जिल्हाधिकारी यांनी घ्यावी. सदर रक्कम वितरित करण्यापूर्वी संबंधित जिल्हाधिकारी यानी शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय / कार्यालयीन आदेश / वित्तीय नियमावली / सार्वजनिक बांधकाम विभागाची कार्यनियमावली / भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांचे निरिक्षण अहवाल / वित्तीय कार्यपध्दती यांचा अवलंब करावा. तसेच सदर रक्कम चालू आर्थिक वर्षात उपयोगात आणणे आवश्यक राहील. सदर निधी कोणत्याही संस्थेत ठेव स्वरुपात जमा करता येणार नाही.

८. प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमातंर्गत (PMJVK) मान्यताप्राप्त सद्भाव मंडप बांधकामासाठी केंद्र व राज्य शासनाकडून प्राप्त झालेल्या निधीच्या विनियोगाबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे तसेच त्रैमासिक अहवाल (QPR) विहित नमुन्यात (अद्ययावत छायाचित्रासह) संबंधीत अंमलबजावणी यंत्रणेने जिल्हाधिकारी

यांच्यामार्फत शासनास सादर करावीत. तसेच विभागाच्या Construction tracker प्रणालीवर देखील विकासकामांची माहिती व छायाचित्रे वेळोवेळी upload करावी.

९. केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाच्या दि.१४/१२/२०१५ रोजीच्या बैठकीतील सूचनानुसार प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमाअंतर्गत (PMJVK) ज्या प्रयोजनाकरिता निधी मंजूर करुन वितरित केला आहे, त्याच प्रयोजनार्थ सदर निधी खर्च करणे बंधनकारक राहील. कोणत्याही परिस्थितीत अन्य प्रयोजनाकरिता सदर निधी खर्च केल्यास सर्व संबंधित अधिकाऱ्यांवर विनाविलंब कारवाई करण्यात येईल.

१०. सदर योजनेंतर्गत केंद्र हिश्श्यावर होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडई-१, २२३५ - सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० - इतर कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना (००) (१७) प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रम (केंद्र हिस्सा) (कार्यक्रम) (२२३५ ए ५४३), ३१ - सहाय्यक अनुदान (वेतनेतर)" तसेच राज्य हिश्श्यावर होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडई-१,२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० - इतर कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना (०१)(१४) प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रम (राज्य हिस्सा) (कार्यक्रम) (२२३५ ए २३१) ३१- सहाय्यक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

११. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४/०६/२०२१ व दि.१४/१०/२०२१ अन्वये प्रशासनिक विभागांस प्रदान करण्यात आलेल्या अधिकांरानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२२०११७१२४९४६२११४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DINESH MADHAVRAO SONAVANE

Digitally signed by DINESH MADHAVRAO SONAVANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITY DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf,
pseudonym=1F9A10571D88646ED6CD168DADBFEDACC3DD2F35,
serialNumber=6ADB2BDBBD3BD651A8ADE806B6E4AEA66DAA5512EA788889AF1515751ABC0181, cn=DINESH MADHAVRAO SONAVANE
Date: 2022.01.17 12:51:25 +05'30'

**( दि. मा. सोनवणे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. अ.मु.सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. विभागीय आयुक्त, औरंगाबाद.
४. जिल्हाधिकारी,हिंगोली.
५. मुख्याधिकारी, नगरपरिषद, हिंगोली.
६. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
७. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व परीक्षा ) मुंबई/नागपूर.
८. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, औरंगाबाद.
९. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नांदेड.
१०. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, हिंगोली.
११. जिल्हा कोषागार अधिकारी, हिंगोली.
१२. वित्त विभाग (अर्थसंकल्प -४/ व्यय -४) मंत्रालय, मुंबई.
१३. नियोजन विभाग (कार्या.१४७१).
१४. निवड नस्ती, (का.७).